मी एक उत्तम डॉक्टर आहें असें नेहमी वाटतें मला. परंतु उत्तम तर राहोच पण अगदी साधारण दर्जाचा कवि म्हणवून घेण्याची ईर्ष्या कधींही उत्पन्न झाली नाहीं माझ्या मनांत. डॉक्टरीच्या धडपडीच्या व्यवसायांत मनाला विरंगुळा म्हणून कधीं कधीं कविता लिहितों मी. सहृदय मित्रमैत्रिणींनीं त्यांचें थोडेसें कौतुक केलें म्हणून आज तीनचार वर्षांनंतर त्या एकदां छापून काढीत आहें. यांतील बऱ्याच कविता ४२ च्या क्रान्तिकालांतील आहेत. तेव्हा कामहि होतें आणि रिकामपणही असावयाचें. सोड सखे ग, पथशिला, क्षमस्व भगवन् वगैरे कविता स्मरण करून तुरुंगांत पुन्हा लिहून काढल्या. त्या तुरुंगाच्या अधिकाऱ्याच्या सौजन्यामुळें घरीं पाठवितां आल्या. अधिकाऱ्याचें नांव जोशी. त्यांच्या चांगुलपणाबद्दल इतके वर्षांनंतरही कृतज्ञता दाखविण्याची संधि मिळाली हें माझें भाग्य. सोड सखे ग या कवितेवर ४३ सालींच सौ. रतन दिघे, एम्. ए. यांनीं अभिप्राय लिहून प्रोत्साहन दिलें. काली ही कविताहि त्यांच्याच प्रोत्साहनामुळें पूर्ण झाली. त्यांचे आभार. श्री. शांता शेळके यांनीं कविता निवडून स्वहस्तें प्रत तयार केली. श्री. मंगेश पाडगांवकर व वसंत बापट यांनींही या निवडीला हातभार लावला. पण जिवलग मित्रमैत्रिणींचे आभार मानणें म्हणजे किंचित कां होईना परकेपणा दाखविणें असें वाटतें.

**वसंत अवसरे**

| | |
|---|---|
| इतिहासाचीं पानें | १ |
| किरात मानव | २ |
| कृत्रिम फुलांस | ३ |
| तो क्षण | ४ |
| प्रीतिदेवते, उशिरां आलिस | ५ |
| हालाहल तें प्याल्यावांचुन | ६ |
| गुल्मोहोर | ८ |
| कशास पोरी डोळे मारिसी ? | १० |
| जुनेंच चित्र | १२ |
| हळूच रसिके | १४ |
| गंगेस | १५ |
| हें वाटतें भीषण | १६ |
| क्रान्ति | १७ |
| माते नमस्ते | १८ |
| थांबू गडे आपण | १९ |
| सोड सख्ये ग | २० |
| गगनपथावर | २२ |
| हो तर | २३ |
| माहीमच्या झोंपड्या | २४ |
| जिव्हा जरा आवरा | २५ |
| हे घोर काली | २६ |
| चांदणीरात्र | ३२ |
| नर्तिकेस | ३३ |
| रजनी | ३४ |
| अपुरी घडविन | ३५ |

| | |
|---|---|
| मनुजसंस्कृति | ३६ |
| तुझी उपेक्षा | ३७ |
| मध्याह्नींचें प्रखर ऊन | ३८ |
| पथशिला | ३९ |
| चिरविदाय | ४० |
| घटहारिता | ४१ |
| क्षमस्व | ४२ |
| अंधारांतिल वृक्ष उभे | ४३ |
| धरी करीं शस्त्र मी ! | ४४ |
| मयकन्यका | ४५ |
| प्रफुल्ल पुष्पापरि तूं होतिस | ४६ |
| मृगजळ | ४७ |
| पिता कर क्षमा | ४८ |
| १५ ऑगस्ट १९४८ | ४९ |
| छायेपरि... | ५० |
| हे दोन अश्रू | ५१ |
| जीवनलहरी | ५३ |
| उषा | ७० |
| नाट्यनृत्य तें | ७१ |
| मोहिनी | ७२ |

'**यात्री**' हा कवितासंग्रह वाचतांना एक गोष्ट ताबडतोब ध्यानांत येते ती ही कीं, मराठी कवींच्या जुन्या किंवा नव्या कोणत्याही विशिष्ट संप्रदायांत यांतल्या कविता बसविणें शक्य नाहीं. या कवितांतले दोष दाखवितां येतील, पण या कवीचा स्वतःचाच असा एक वेगळा मार्ग आहे हें कुणीही मान्य करील. डॉ. अवसरे हे जीवनपथावरचे एक रसिक यात्री आहेत; आणि वाटचाल करतांना आलेले विविध अनुभव रेखीवपणाची फारशी पर्वा न करतां या कवितांत त्यानीं प्रांजलपणें ग्रथित केले आहेत.

जीवनांतल्या भव्यतेची आणि उदात्ततेची त्यांना असलेली ओढ या संग्रहांतल्या कितीतरी कवितांतून व्यक्त झाली आहे. दुपारच्या रखरखीत उन्हांत शांतपणें उभ्या असलेल्या गुल्मोहोर वृक्षाला पाहून ते म्हणतात,

**'चितेपरी या जळत्या दुपारीं !**
**असीम ऐशी फुलवीत शांती**
**उभा इथें हा**
**उभा कुणी शान्तमना तपस्वी**
**या युद्धकोलाहलपूर्ण लोकीं**
**हा गुल्मोहोर**

... ... ... ... ...

**माथ्यावरी झेलित अग्नि घोर,**
**सुवर्णपुष्पें उधळी सभोंतीं...**

पण जीवनांतल्या उदात्ततेकडे पहातांना जगांतल्या दैन्याकडे त्यांचें दुर्लक्ष झालेलें नाहीं. ‘ माहीमच्या झोपड्या ’ या कवितेंत रस्त्याच्या कडेला गोणपाटांचे तुकडे आणि गंजलेले पत्रे जोडून त्यांच्यांत मुलाबाळांसह संसार करणाऱ्या कंगालांचें वर्णन पुढील जळजळीत शब्दांनीं केलें आहे :

**‘ याच भिंतिच्या आडोशाला**
**बाळ एक अन् म्हातारी**
**सहज मृत्युचे घास दोन ते**
**लपले होते अन्धारीं ! ’**

या दैन्याचें नुसतें वर्णन करून कवि थांबलेले नाहींत. दैन्याच्या ज्वालेचेंही ओझरतें दर्शन त्यांनीं दिलें आहे. एका जीवनलहरींत ते म्हणतात,

**राबविसी दिनभर मज**
**आज शिळ्या रोटीस्तव**
**रक्तांतुनि माझ्या बघ**
**इमले हे उठती नव**
**ताणुं नको तार अती**
**केव्हां जर तुटली ती**
**फटकारुनि तुजला रे**
**मृत्युमुखीं धाडिल ती ! ’**

‘ कृत्रिम फुलांस ’ आणि ‘ गंगेस ’ या दोन सुनीतांची भाषा जितकी अभिजात आहे तितकीच प्रत्येक सुनीतांतली कल्पनाही अभिनव आहे. कांचपात्रांतल्या कृत्रिम फुलांस उद्देशून कवि विचारतात,

**‘ पुष्पांनो तुमच्या मनोहर अशा रंगच्छटा पाहुनी**
**संध्या जे करि रंग चित्रित करी तेही फिके वाटती**
**वारा, पाऊस, ऊन हीं न करिती आघात तुम्हावरी**
**... ... ... ... ...**
**लाभे जीवनही सुदीर्घ, तुमचें सद्भाग्य मोठें अहा !**

कृत्रिम फुलांच्या या सद्भाग्याची प्रशंसा केल्यानंतर कवि त्यांना शेवटीं प्रश्न करतात,

> ' संध्या आहुति देउनि निज रची ही यज्ञ शोभा नभीं
> रक्तस्नात उषा विशाल गगनीं ही क्रान्तिगाथा लिही
> यांचें दर्शन जाहलें कधिं तरी सांगा फुलांनो तुम्हां ? '

' गंगेस ' या सुनीतांत ' अति उच्च अशा विष्णुपदां ' पासून झालेल्या गंगेच्या ' घोर ' अधःपतना 'चें वर्णन करून कवि शेवटीं म्हणतात,

> ' जेथें पृथ्विवरी सदैव विहरे दारिद्र्य तें भीषण
> ... ... ... ... ...
> तेथें देत जनांस जीवन नवें भागीरथी ओघ हा
> धांवे नित्य तुझा सदा उतरत्या मार्गांतुनीही अहा !
> ब्रिन्दूंतूनि तुझें सदा विचरतें सिन्धूकडे जीवन
> गंगे गे विनिपात हा शतमुखी भासे तुझा मोहक !

हे उतारे वाचून कुणाला वाटेल कीं हा ' यात्री ' फार गंभीर प्रकृतीचा आहे, पण तें मुळींच खरें नाहीं. बऱ्याच कविता गंभीर आहेत हें खरें आहे, पण नाजुक प्रेमाच्या किंवा उपरोधपूर्ण विनोदी कविता या संग्रहांत नाहींत असें नाहीं. ' कशास पोरी डोळे मारिसि ? ' या कवितेंत पांढरपेशांच्या प्रणयाचें चित्रण केलें आहे,

> कशास पोरी डोळे मारिसी
> शील कशाला हलुच घालिसी
> ... ... ... ... ...
> ब्राह्मण माझा बाप आणि मी
> परिस्थितीचा पांढरपेशा
> पोटासाठीं टपाल खातें
> भाकर देई सुकी कोरडी

आया बहिणी हिस्सा घेती
मीच एकला कमावणारा
तुझी आणखी त्यांतच भरती !
शिवाय माझी उच्च संस्कृति
क्षाडिक विभ्रम तुझा सखे हा
मनांत उठवी डोंगर भीती
... ... ... ... ...
असाच मारित डोळा परि तूं
जरा थांब ग थांब जराशी
अक्षर सुन्दर काढुनि लिहितों
तुझियावरती एकच कविता ! '

यात्रीचें स्वरूप हें असें आहे. या 'यात्रीची' सोबत मराठी वाचकांना आवडेल अशी मला खात्री वाटते.

अनंत काणेकर

# इतिहासाचीं पानें

अजून या निष्पर्ण तरूंच्या
रस्त्यावरतीं दिसति कमानी
रक्ताळुनि अन् रखडत फिरती
कितीक छाया त्यांच्या खालुनि

अजून जळत्या या नगरांतुनि
पाषाणांच्या राशीखालीं
लोळत पडलीं किती जीवनें
अर्ध्यावरतीं संपवलेलीं !

अजून भडके प्रचंड होळी
चहूंकडे ही मानवतेची
धडधड पेटे तिच्यांत सारी
मानवप्रज्ञा युगायुगांची

नभांत वाहे स्वर्गंगा ही
आणि वाहतो पवन वनांतुनि
इतिहासाचीं उडती पानें
मृत आत्म्यांच्या राशीवरुनी !

# किरात मानव

आदिकवीच्या संतापांतुनि
जन्मा आली पहिली कविता
निर्बलतेची शापवाणि ती
जाळित सुटली मात्र प्रतिष्ठा

किरात मानव त्यास द्यावया
मानवतेची दीक्षा सुंदर
संतत श्रमुनी विशाल लिहिलें
रामायण तें ऋषिनें नंतर

अजुनी लिहिते रामायण तें
त्रिकालदर्शी कविची स्फूर्ती
अमर कल्पना पहात सरल्या
युगायुगांच्या जीवनज्योती

किरातमानव स्वैर विहरतो
या अवनीवर नाशित जीवन
जीवन त्याचें अजुनी केवळ
भयनिद्रा अन् भूक मैथुन

आणि प्रतिष्ठा जाळित अथवा
दीक्षा द्याया मानवतेची
रखडे त्याच्यामागुनि संतत
पवित्र वाणी अमर कवीची !

# कृत्रिम फुलांस

पुष्पांनो तुमच्या मनोहर अशा रंगच्छटा पाहुनी
संध्या जे करि रंग चित्रित नभीं तेही फिके वाटती
कारागीर कुणी पणास अपुलें कौशल्य कीं लावुनी
देई रूप तुम्हा मनोज्ञ रचुनी नानाविधा आकृती

वारा, पाउस, ऊन हीं न करिती आघात तुम्हांवरी
प्रासादीं वसणें, मनोहर अशा या कांचपात्रांमधीं
जें ना वन्य फुलां कधींहि मिळतें ऐसें फुलांनो तुम्हां-
लाभे जीवनही सुदीर्घ तुमचें सद्भाग्य मोठें अहा !

संध्या आहुति देउनी निज रची ही यज्ञशोभा नभीं
रक्तस्नात उषा विशाल गगनीं ही क्रान्तिगाथा लिही
वीरांच्या अमरस्मृतीच जणुं कीं स्वातंत्र्यमार्गावरी
तारा या नवलाख तेवि जळती अन्धारपंथावरी

यांचें दर्शन जाहलें कधिं तरी सांगा फुलांनो तुम्हां
पुष्पांनो, तुम्हि पाहिली कधिं वदा विश्वांतली भव्यता ?

# तो क्षण

विस्मृतिचा सखि पडदा फाडुन
जाइल तो क्षण चुंबुन तव मन

गहन निशेचें गूढ गान कधिं
भरुनि स्वरावलि तव नयनांमधिं
स्वप्नमूर्त सखि करील तो क्षण
उकलित छेडित सुप्त तुझें मन

कवनें कधिं हीं नाचत येतिल
सहज संभ्रमीं सखि तूं गाशिल
उठवित हृदयीं चंचल स्पन्दन
जाइल तो क्षण चुंबुन स्पर्शुन

जातिल क्षितिजें चिंतनिं रंगुन
आकाशांतिल तुझ्या भावघन
सौदामिनिपरि उजळित छेडुन
जाइल तो क्षण चुंबुन तव मन !

विस्मृतिचा सखि पडदा फाडुन
जाइल तो क्षण चुंबुन तव मन

# प्रीतिदेवते, उशिरां आलिस

हळूच सरके अपरेपाशीं
रक्तसुवर्णी वर्तुल भास्कर
निगूढ कोमल संगीताच्या
लहरी उठल्या मरूपथावर

तरुपर्णांचा चुंबनध्वनि अन्
प्रीतिसाद मृदु नरपक्ष्याचा
यांहुनि होता निराळाच तो
ध्वनि संध्येच्या संगीताचा

हळुहळु येत्या अंधारासम
करुणराग त्या संगीताचा
व्यापित गेला गगनधरेला
प्रदेश उकलित सुप्त मनाचा

दूर कुठेंतरि उठे हुंदका
पिचलेल्या त्या पान्यामधुनी
उष्णाश्रूंचा स्पर्श जाहला
मृत्युशीतशा पवनावरुनी

डोंगरधारेवरुनी आली
धांवत धांवत रजनी डोळस
संध्याछाया कुजबुजल्या हळु
प्रीतिदेवते, उशिरां आलिस !

## हालाहल तें प्यायल्यावांचुन

निसर्गचित्रें पाहत चंचल
अंबर वर अन् शिला उशाशीं
कवितासृष्टी निर्मित अपुली
पडलों होतों मी वनवासी

रम्य उषेची निरखित सुषमा
संध्यारंगीं धुन्द होउनी
तरंगिणीचा कलरव ऐकत
रचीत बसलों कविता गाणीं

आलापित निज स्वर उन्मादक
कुठुनीतरि तूं समोर येशी
जमूं लागली सभोंवतालीं
दुःखीकष्टी मानवसृष्टी

विरून गेले किंकाळ्यांतुनि
हृदयान्तरिंचे कोमल सूर
आणि कल्पना चित्रांवरतीं
जमल्या छाया काळ्याशार

अग्नि रक्त मग घेउनि हातीं
नवीन गाणीं लिहीत बसलों
मानवतेच्या भविष्यकाला
नवरंगीं सजवाया सजलों

तोंच करांगुलि धरुनी माझी
हळूच वदसी कातर शब्दें—
'हालाहल तें प्याल्यावांचुन
अमृतमंथन होइल कैसें ?'

अशब्द मी निःस्तब्ध राहिलों
विनम्रमस्तक क्षणभर तेव्हां
रुद्ररम्य तव ताण्डवमूर्ती
शुभंकरी ती बघतां बघतां

# गुल्मोहोर

दुपार होती
दुपार होती जळती उभी ती
उभी जशी मत्सरग्रस्त मानिनी
टाकीत होती
बेचैन सारी धरणी उसासे
रोग्यापरी कीं ज्वरग्रस्त तेव्हां
पाहात होतें
आकाश तें नील निरभ्र शान्त
श्रीमन्त तो जेंवि विकारशून्य
पाही दुरूनी
कंगाल दारिद्र्य हळू हळू तें
जातां सदा मृत्युमुखांत घोर

अशा दुपारीं
बेकार मी काम कुठें तरी तें
मिळेल आशा धरुनी मनांत
रस्त्यामधूनी
तापूनि घामाघुम होउनीयां
थकूनियां चालत मंद तों

समोर तोंच
मीं पहिला उंच विशाल एक
प्रफुल्ल अन् सुंदर गुल्मोहोर
क्षणाक्षणाला

वाऱ्यासवें सोनफुलें तयाचीं
करीत तीं हस्तमिलाप होतीं
अवर्णनीय
सौंदर्य तें पाहुनि शांत झाला
सन्ताप सारा मनिंचा तनूचा

अशा दुपारीं !
चितेपरी या जळत्या दुपारीं !
असीम ऐशी फुलवीत शान्ती
उभा इथें हा
उभा कुणी शान्तमना तपस्वी
या युद्धकोलाहलपूर्ण लोकीं
हा गुल्मोहोर

ही शूरता का रमणीयतेची
कीं चारुता हीच पराक्रमाची
उभी समोर
माथ्यावरी झेलित अग्नि घोर
सुवर्णपुष्पें उधळी सभोंतीं !
हा गुल्मोहोर
विशाल अन् पूर्ण प्रगल्भ ऐशा
शोभाच का त्या नवजीवनाची !
निरखून त्यांतें
गेलों पुढें आतपतप्त मार्गी
होती न माझी परि मंद चाल
तो गुल्मोहोर !

# कशास पोरी डोळे मारिसी ?

कशास पोरी डोळे मारिसि
शीळ कशाला हलुच घालिसी
हवी तुला का प्रीती माझी
कुणास ठाउक प्रीति काय ती ?

परिस्थितीच्या जाळ्यामध्यें
थकलेल्या त्या हरिणापरि मी
मुखिं फेंसाळत तडफडतों हा
कशास पोरी डोळे मारिसि

मजूर जातो गिरणीमधला
सायंकाळीं गुत्त्यामध्यें
'ओव्हर टाइम' खिशांत घालुनि
वनमालेचा मुखडा बघतो
शीळ ऐकुनी श्यामल राधे
उत्तर देइल तोच तुला ग

ब्राह्मण माझा बाप आणि मी
परिस्थितीचा पांढरपेशा
पोटासाठीं टपालखातें
भाकर देई सुकी कोरडी
आया बहिणी हिस्सा घेती
मीच एकला कमावणारा
तुझी आणखी त्यांतच भरती !

शिवाय माझी उच्च संस्कृती
लाडिक विभ्रम तुझा सखे हा
मनांत उठवी डोंगर भीती

असाच मारित डोळा परि तूं
जरा थांब ग थांब जराशी
अक्षर सुंदर काढुनि लिहितों
एकच कविता तुझियावरतीं !

# जुनेंच चित्र

या नगरीच्या सीमेपाशीं
जुनेंच हें तर चित्र सख्या रे
कोण रंगवी ! मला न ठाउक
कोण रंगवी तूंच पहा रे !

शोषुनि जीवनतैल जयांचें
नगरीचे या दीप झळकती
अज्ञानावर उभी जयांच्या
शहरींची या उच्च संस्कृती

जीर्ण झोंपड्या त्या गरिबांच्या
नगराच्या बघ सीमेवरतीं
ग्रीष्माची भिडतांच झुळुक ती
क्षणार्धांत या पडती जळती

आणि दरिद्री शोणित ज्यांचें
अखण्ड रचितें नव धनराशी
त्या गरिबांच्या जीर्ण झोंपड्या
येथ उभ्या या सीमेपाशीं

मरणोन्मुख निज जीवज्योती
जाळित येथें दीप एकला
भकास त्याच्या मन्द प्रकाशीं
बघुनी येथिल घेच सोहळा

चिवडित बसलीं सान बालकें
कचऱ्याची ही पेटी येथें
गन्ध! जन्तु! छे! खुळ्या कल्पना
येथ मृत्युही मन्द पदीं ये

पहा भुतांसम येथ चालती
मजुरांचीं हीं शरिरें काळीं
जगण्यासाठीं जळतें जीवन
उरते त्याची मात्र काजळी

उग्र दर्प ये तुला! कशाचा?
हेंच एकलें येथें औषध,
सतत–मृत्युच्या विसरायाला
घोर वेदना जहरी दाहक

थांब थांब हें कवाड तुटकें
उघडुनि रसिका बघूं नको रे!
अंधारीं या लपते लज्जा
त्याच मुलांच्या मातेची रे!

एकच अवघें वस्त्र घरांतिल
रोगी बाळा झांकुन घेई
जीवनभर तें एकच वस्त्र
नाहीं येथ नवी नवलाई

या नगरीच्या सीमेपाशीं
भेसुर असलें चित्र सख्या रे
कोण रंगवी मला न ठाउक
कोण रंगवी तूंच पहा रे!

# हळूच रसिके

हळूच रसिके जवळीं आलिस !

अजुनि आठवे रात्र चांदणी
निशिगंधाचा सुगंध पवनीं
विमल प्रीतिचीं नवथर गाणीं
भाग्यफुलें जणुं उधळित आलिस
हळूच रसिके जवळीं आलिस !

अजुनि आठवे निष्ठुर जगतीं
स्वार्थपरायण विषमय जगतीं
एकाकी मम जीवनपंथीं
अमृतघट तूं घेउनि आलिस
हळूच रसिके जवळीं आलिस !

अजुन आठवे हृदय कोंवळें
तव पूजेस्तव वेडें झालें
पुष्प होउनी चरणिं धांवलें
तोंच देवते विलुप्त झालिस
किमर्थ रसिके जवळीं आलिस ?

# गंगेस

सोडूनी अति उच्च विष्णुपद तें आलीस तूं खालतीं
‘ कैसें घोर अहो अधःपतन हें ’ उद्गार ऐसे किती
आले कर्णिं तुझ्या तुवा न गणिलें, तूं चंद्रमौलीशिरीं-
गंगे येउनि राहसी तुज रुचे कंगाल—मैत्री खरी

एकाद्या सुकुमारशब्दयुतशा सत्प्रेम काव्यापरी
शोभे कोमल-रश्मि-भूषित अशी ती चंद्रलेखा जिथें
तेथेंहि हर मस्तकीं न स्थिरता आली तुझ्या जीवनीं
गंगे या अवनीवरी उतरशी तूं निम्नगा होउनी

जेथें पृथ्विवरी सदैव विहरे दारिद्र्य तें भीषण
जेथें दुःख करी अखण्ड अपुलें भेसूर आक्रंदन
तेथें देत जनांस जीवन नवें भागीरथी ओघ हा
धांवे नित्य तुझा सदा उतरत्या मार्गांतुनीही अहा !

बिंदूंतूनि तुझें सदा विचरतें सिंधूकडे जीवन
गंगे गे विनिपात हा शतमुखी भासे तुझा मोहक !

# हें वाटतें भीषण

गोरा रंग अहा मनोहर तसे डोळे टपोरे किती
काळे केश कसे विशाल निटिलीं—वायूसवें खेळती
शोभे उन्नत ऊर गोंडस भुजा रम्याकृती भामिनी
अंगीं यौवन खेळतें निथळतें लावण्य देहांतुनी

नाहीं भूषण एकही तनुवरी वेणी फुलांची शिरीं
आहे वेष सुरम्य त्यांतहि किती साधेपणा तो तरी
भासे सात्त्विक ही जशी तुळशिची दारांतल्या मंजिरी
वाटे कोणि कुलीन लीन युवती मोठ्या घरींची खरी

मायावी नगरींत या परि असे कोणीतरी आणिली
ही गोमन्तक—कन्यका सुमधुरा कैशी कळी कोवळी
लावण्या निज मुग्ध दावित जगा बाहेर न्याहाळित
येथें ही बसते निशामुखिं सदा निःशब्द आमन्त्रित !

काया कुस्करितो कुणीहि कधिंही फेंकून थोडें धन
याची भीषणता तिला न उमजे हें वाटतें भीषण !

# क्रान्ति

येई चापधरा सुवर्णवसना आकाशमार्गीं उषा
लोळे छिन्नविछिन्न-देह तिचिया अन्धार पायांतळीं
सृष्टीच्या प्रथमोद्भवींच घडली क्रान्ती अपूर्वा अशी
तीचें वैभव रक्तलांच्छित खुले हें नित्य नीलाम्बरीं

तेव्हांपासुनियां लिहीत बसला आहे पुराणा मुनी
कालाचें करिं भूर्जपत्र धरुनी प्रत्येक रात्रींदिनीं
देई त्या इतिहास नाम ! बघते त्याच्या सदा लेखनीं
सारी मानवता भविष्यपथ त्या अत्यादरें वन्दुनी

त्यानें चित्रिलि ही पुनःपुनरपी तल्वार जीच्या करीं
शोभे मानव-रक्त-रंजित अशी स्वातंत्र्यदेवी खरी
शान्तीच्या मृदु शुभ्र तेजवलयीं ती रक्तसृष्टी विरे
ऐसी मोहक पार्श्वभूमि रचुनी तच्चित्र केलें पुरें

स्वातंत्र्योन्मुख मानवा अनुभवी सांगे सदा हा मुनी :
मित्रा, होत सशस्त्र एक जगतीं क्रान्ती यशस्वी खरी

# माते नमस्ते

जेव्हां तूं चढशील हांसत पुन्हां स्वातंत्र्य-सिंहासनीं
जेव्हां पुत्र प्रमत्त गातिल तुला स्वातंत्र्यगीतें नवीं
जेव्हां विश्व समग्र लीन चरणीं होईल अत्यादरें
तेव्हां आठवशील काय अमुतें माते महन्मंगले ?

सौख्याचा क्षण एक जीवनिं अम्ही आई नसे सेविला
मृत्यूचे अजि शीतपाश रुळती कंठांत हे आमुच्या
आम्ही आजवरी तुझ्याच चरणीं सर्वस्वही अर्पिलें
आम्हां आठवशील काय परि तूं माते महन्मंगले ?

येथें आज अम्ही घनान्धतिमिरीं या बंदिशालेमधें
मृत्यूच्याच अथांग घोर तिमिरीं जाणें उद्यां आमुतें
आम्ही विस्मृतिच्या परी घनतमीं होणार का लुप्त गे !
आशा आठवशील तूंच अमुची सेवा महन्मंगले !

आशा मानव सर्व ठेवि अपुल्या दारीं पहा मृत्युच्या
आशा अन्तिम तीहि आज त्यजिली माते नमस्ते अतां !

# थांबूं गडे आपण

चंदेरी शशिबिंब शांत उगवे हें शैलमाथ्यावरी
सारी अंधुकशी विशाल अवनी स्वर्गीय तेजें भरी
सृष्टीचें जणुं रम्य यौवन खुले निर्व्याज सौंदर्य हें
अंगांगांत समावुनी न निथळे उन्मेषशाली असें ?

नाचे हा पुढतीं अथांग दरिया चंद्रप्रकाशामधें
त्याचें गर्जित मंदमंद घुमतें या तालराईंतुनी
फेंसांचीं हिमशुभ्र सुंदर जणूं लेवून माथां फुलें
ही रम्या जलवंति कोमल पदीं नूपूर झंकारिते

झाल्या धुंद दिशा, पहा धवळला व्योमांतरीं नीलिमा
काळी नील विशाल ही उजळवी शैलावली चंद्रमा;
ज्योत्स्नेची जणुं वारुणी झिरपुनी शैलांवरी पाझरे
झाले ताल पिऊन तर्र झुलती...त्यांच्या तळीं कांपरें

हें सौंदर्य अतीव पाहत जरा थांबूं गडे आपण
या ऐशाच नितांतरम्य समयीं ये प्रीति रोमांचुनी

# सोड सखे ग

उभी दिशांच्या अष्ट दलांवर
रक्तरंजिता उषा सुवर्णा
प्रीतिबंधनीं बांधु नको ग
सोड सखे ग सोड मला ना

सुगंधश्वासें मोहुनि मजला
तुवां विंधिलें हृदय फुलांनीं
दिधली ओष्ठांच्या पात्रांतुनि
अखंड मादक लाल वारुणी

मृदु स्वप्नांचीं रंगवि चित्रें
निळ्या तुझ्या नयनांतिल पाणी
हृदयावर तव गात राहिलों
थरथरतीं तीं अबोल गाणीं

तारांकित बघ वितळुनि जाई
निळेंनिळें रजनीचें अंग
स्वप्नशृंखला विरे कवीची
जैसें परिसुनि तें रणशिंग

उसळुनि आले कडेकडेच्या
क्षितिजावर रक्ताचे रंग
शोणित–सागर लोळत येई
फेकित अपुले लाल तरंग

मरणान्तिक ही धडपड तळमळ
लाख मुखींची ये किंकाळी
दुबळयांचें हें मोडे घरकुल
बघ जुलुमाच्या टांचाखालीं

चाटित जिभल्या सैनिक फिरती
मानवरक्तासाठिं पहा हे
हाय तयांच्या मगरमिठींतुनि
पतिव्रतेची आर्त हांक ये

आणि पहा हें भरबाजारीं
अन्नकणांस्तव रखडे यौवन
तिथेंच लागे जित्या मढ्यांना
घरघर भयकर ती मरणाहुन

दास्यवन्हिच्या अनंत ज्वाला
क्षणाक्षणा या जाती चाटुन
सखे फुलांच्या शेजेवरतीं
हृदय जातसे माझें करपुन !

त्या वन्हीला विझवायाला
सोड सखे ग मला जाऊं दे
आणि तयावर निज रक्ताची
भरुनी ओंजळ मला शिंपुं दे

# गगनपथावर

गगनपथावर दौडत आला
हरिणरथांतुनि शशांक सुन्दर
अन् ज्योत्स्नेच्या रजःकणांनीं
व्यापुनि गेलें दिगन्त अंबर

प्रकाशपुष्पें क्षणांत चंचल
वनांत फुललीं पानोपानीं
वीणा छेडित अवखळ वारा
हळूच गेला त्यांस चुम्बुनी

श्रान्त वनश्री शान्त झोंपली
विशाल गिरिच्या त्या अंकावर
चिमणा निर्झर चुळबुळ करि परि
धरणीमातेच्या हृदयावर

दूर दूर त्या क्षितिजापाशीं
सागररेषा दिसे रुपेरी
शेषनाग जणुं विळखा घालुनि
धरणि सांवरी व्योमसागरीं

दिव्य दृश्य तें बघतां बघतां
स्वप्नरंजनीं चित्त गुंगलें
तोंच उषेचें पाउल पहिलें
जागृति आणित क्षितिजीं पडलें

# हो तर

लाज गुलाबी अजुनि मुखावर
वद सखि वद सखि पुनश्च ‘ हो तर ! ’

तव नेत्रांच्या नीलमण्यांतुनि
सांडत होतें तेज, विमोहुनि
तुजसि चुम्बिलें सहजीं रमणी
होई तव अपराधी मी तर...
धीटपणानें वदलों परि मी
‘ राग तुला का आला मानिनि ? ’
लखलखलें नव तेजच नयनीं
मान मुरडुनी वदलिस ‘ हो तर ! ’

मृदु ओठांचे लाल शिंपले
सर मोत्यांचे त्यांत चमकले
रागाचें परि नाटक फसलें
स्मितरेषा तव खुले मुखावर
स्वप्न कल्पनारम्य मनांतिल
प्रकट जाहलें क्षणांत चंचल
पुन्हां माधुरी अनुभवुं दे चल
बोल कुमारी पुनश्च ‘ हो तर ! ’

# माहिमच्या झोंपड्या

कळकट पत्रे, जुनीं लांकडें
ढीग मातिचे हे पडले
जुनाट कपडे गोणी-तुकडे
त्यांस कवळुनी उरिं बसले

मधेंच कोठें भिंत लांकडी
उभी परन्तू थरथरते
नजर लावुनी आकाशावर
प्रश्न अनुत्तर कीं पुसते

याच भिंतिच्या आडोशाला
बाळ एक अन् म्हातारी
सहज-मृत्युचे घांस दोन ते
लपले होते अन्धारीं

आरोग्याचें तत्पर खातें
वैभवशाली नगरीचें
जन्तु मारण्या त्या जागेंतिल
जागृत झालें झणिं साचें

कळकट पत्रे, जुनीं लांकडें
ढीग मातिचे मग पडले
जुनाट कपडे गोणी-तुकडे
'मानवतेचा जय' वदले

# जिव्हा जरा आवरा

ज्यांनीं उभा जन्म देऊन देशा स्वयें आग लावीयली जीवना
या चार भिन्तींमधें देह ज्यांचे तयांची तुम्हा का असे कल्पना ?
व्यक्तित्व, आशा तशी बुद्धि ज्यांची जळूनी कणानें कणानें झिजे
कसें चाललें घोर आयुष्य त्यांचें, तुम्हाला परी तें कळावें कसें ?

अजूनीहि विच्छिन्न देहीं तयांच्या पहा खेळते दिव्य तेजस्विता
स्वातंत्र्य–संकल्प उच्चारिला जो अजूनीहि ओष्ठीं स्फुरे त्यांचिया
अजूनीहि त्यांच्या उरीं ध्येयज्योती सदा संप्रकाशे, करी नर्तना
असे क्रान्तिमार्गींच विश्वास त्यांचा दुज्यांचीहि त्यांना जरी कल्पना

घडे कार्य माझ्यामुळें सर्व ऐशी अहन्ता न त्यांना कधीं स्पर्शली
कृती जीवनाचें सदा मर्म होतें न त्या कीर्तिची क्षुद्र इच्छा मुळीं
न वाक्पाटवाची तयां हौस केव्हां स्वदुःखासुखाची न दृष्टी तयां
कधीं जीवनीं दंभ ना भीरुता ती कधीं स्पर्शली ना मना त्यांचिया

हिंसा अहिंसा सदा वादरंगीं तुम्ही होतसां दंग, व्हा बापुडे !
परी लोल जिव्हा जरा आवरा त्यां वदा देशद्रोही न याच्यापुढें !

# हे घोर काली

हे घोर काली
रोरूयमाना क्षुधयोग्र देवी
तूं भूतराज्ञी चिरयौवना तूं
आक्रन्दसी तूं चिरनाशगान
होई बली त्वन्मुखिं वर्तमान
भविष्य वांच्छी तव घोर तृष्णा
समोर नाचे तव मृत्युगीत
प्रचण्ड मूर्ती विकराल कृष्ण
स्फुरे तुझें आज अनन्त–गान

हे क्रान्ति देवी
कठोर अन् नीलनभोविदारी
सह्याद्रिशृंगासम रुद्रमूर्ती—
तुझी करी ताण्डव; मानवी या
प्रमत्त–ऊर्मी–अतलान्त–सागरीं
वैरार्त ऐशा जनमेजयाच्या
त्या सर्पयज्ञासम सर्वनाशी !
ही अग्निज्वाला नयनीं त्वदीय
नाचे अहा ऊर्ध्वमुखी कराल
मुखांत घेशी तव सर्वभक्षी
आकर्षुनी ती मनु–वंश–संस्कृती
विध्वंसनृत्यांतुनि या तुझ्या का
स्फुरेल तें मंगल शान्तिगीत ?

हे कालरात्री
अथांग ऐशा तव शून्यगर्भी
हिरण्यगर्भस्समवर्तताऽग्रे
प्रसुप्त होता जणुं विश्वकोष
सृष्टी न होती नच सूर्यमाला
नीहारिकापुञ्ज न रात्रिदीप
होता कुठें हा अतलान्त अब्धी ?
उत्तुंग शैलावलि अन् महानद
वनस्पती–जीवन जीव जन्तु
कांहीं न होतें, मनुवंश कैसा
असेल हा क्षुद्र, परन्तु होती
निरामया शान्ति स्वयंभु दिव्य !

विध्वंसिनी हे
अनादि कालीं स्फुरली मुखांतुनी
तुझ्याच विध्वंसऋचा तपस्विनी
अन् भंगली शान्ति, सहस्त्रचूर्ण
झाला क्षणार्धीं मग विश्वकोष
अन्धारमार्गीं फुलल्या निहारिका
अन् तारका–नर्तन तालबद्ध
प्रवर्तलें नील नभोऽङ्गणांत
समुद्रनीलांबरधारिणी ही
उत्तुंग–शैल–स्तन–मण्डला ये
पृथ्वी अनन्तांत करीत नृत्य

हे जन्मदात्री
संहारनृत्यांतुनि जन्म घेई

तुझ्याच ही प्रकृति रुद्ररम्य
उत्तुंग शैलावलि नील हांसे
अन् अम्बुधी देइ तरङ्गताल
वृक्षावली अम्बरचुम्बिता ही
फुलें, मुलें सान तशींच जन्मलीं
माते परी ताण्डवनृत्य चाले
अखण्ड तें क्रूर विनाशकारी
तुझें, स्फुरे निर्मितिगान रम्य
त्यांतूनही दिव्य तुझ्याच ओष्ठीं

हे विश्वधात्री
दशावतारांतुनि जीवसृष्टी
कलाकलांनीं प्रकटे मनोज्ञ
समुद्रलक्ष्मी स्फुरली अनन्त
विहंगमा तेंवि विचित्रवर्णी
वसुन्धरेच्या उदरांतुनी ये
परंपरा नित्य पराभवाची
रची यशाची रमणीय गाथा
ज्याच्या, असा मानव हा प्रबुद्ध

संहारराज्ञी
विध्वंसतृष्णा परि ती अखण्ड
शमे तुझी ना, करि अट्टहास्य
तूं नाचसी शोणित-मांस-भक्षणे
कराल वाजे डमरू करांत
हा युद्ध-कोलाहल-नादपूर्ण
रक्तारुणा ही तव क्रूर दंष्ट्रा

भक्षीतसे मानव-वीर मत्त
सिंहासनें मत्त नृपाल सारे
तुझ्या पदीं छिन्नविछिन्न होती
विकीर्ण-केशा मृतभूमि होई
महान् अशी ती नगरी क्षणांत
अन् क्रान्तिनृत्यांतुनि जन्म घेई
तुझ्या, नवी मानव-वश संस्कृत।

संहारिणी हे
समुद्रजाता पृथिवी जशी ती
रोधीतसे ताण्डवनृत्य अब्धिचें
मनुष्य उत्क्रान्तिपथानुसारी
तूं निर्मिलेला झटतो सदा हा
विध्वंस-नृत्या शमवावयातें
तुझ्या, पहा मानव-रक्त-लांच्छिते
सुनिर्मितीचा परमोच्च बिन्दू
सदा झटे पूर्णविराम द्याया
संहार-नृत्या तव रुद्र काली

हे क्रान्ति काली
पातें तृणाचें पद--छिन्न-भिन्न
पुनः पुन्हां नूतन जन्म घेई
या नाश-नृत्यांतुनि गे त्वदीय
पुनः पुन्हां ही प्रकटे नवीन
अत्युज्ज्वला मानव-वंश-संस्कृती
करालता विश्वविराट पाही
तुझी अहा, शान्तमना मनुष्य

कारुण्यपूर्णा मृदु प्रेमधारा
अर्पूनिया शान्त तुला कराया
हा बुद्ध पाही प्रकटे प्रबुद्ध
अन् शान्ति शान्ती वदुनीच ख्रिस्त
अर्पीतसे मंगल–रक्तधारा

हे रक्तराज्ञी
कराल चाले तव नृत्य–लीला
तृषार्त तो कण्ठ तुझा अजून
वांच्छीतसे मानव--रक्त ऊन
हा विश्वतेजाब्धि विशाल डोले
झेली तुझी ताण्डव–नृत्य–लीला
त्या विश्वतेजाब्धित एक बिन्दू
अनन्तरत्ना रमणीय पृथ्वी
अन् पृथ्विच्या याच विशालपृष्ठीं
हा मानवी केवल बिन्दुमात्र
या सान बिंन्दूतच विश्वग्रासी
विश्वाब्धिची दिव्य तरंगलीला
घेई परी स्पन्दन हें नवीन
अन् शान्तिचें रम्य मनोज्ञ गान
हा गात येई सुविराट आत्मा
दिक्काल व्यापूनि पहा विलासे
याच्या मुखींचें चिर शान्ति–गान
हा मानवी क्षुद्र न बिन्दुमात्र
प्रचण्ड तेजान्वित सिन्धु डोले
विश्वान्तरीं प्राण--तुषार याचे
कारुण्यधारा पसरीत जाती

नभान्तरींचे शतकोटि नेत्र
स्थिरावले या नवजात तेजें
अन् शान्तिचें मंगल गान गाती
" अत्रैव विश्वं भवत्येकनीडम् "

हे विश्वक्रान्ति
सुनिर्मितीचें तव रम्य स्वप्न
अमूर्त, हें रूप सुरम्य घेई
विध्वंसलीलेंतुनि आज तूझ्या
हें शान्तिचें मङ्गल क्रान्तिगीत
स्फुरे, परी मानव–रक्त–तृष्णा
तुझी न कां ती शमली अजून ?
या तीन तूझ्या अनलांगुलींनीं
शोषूनि घेसी नररक्त आज
हे कालि हे खपरधारिणी हे
हे कृष्णवर्णे नररुण्डधारिणी
शमेल केंव्हां तव रक्त–तृष्णा ?
संहारनृत्यांतुनि विश्वधात्री
तुझ्या कधीं मंगल शान्तिगीत
स्फुरेल का सांग पुन्हां अनस्त ?

# चांदणीरात्र

क्षणैक छाया कृष्ण घनाची
नील नभांतिल शशिबिम्बावर
थरारुनी ती विलुप्त झाली
जसा पराभव पुरुषत्वावर

पूर्ण निराशेसमान काळ्या
पानांच्या त्या पार्श्वभूमिवर
प्रणयाच्या मृदु स्वप्नांपरि मग
फुलें उमललीं शुभ्र मनोहर

शुभ्र पथशिला पिउनि चान्दणें
रस्त्याच्या त्या कडेकडेला
बालमनींच्या स्वप्नसृष्टिंतिल
दिव्य पऱ्यांसम हांसत बसल्या

आणि जलधिच्या फेनराशिंतुनि
प्रकटावी कुणि दिव्य अप्सरा
त्यापरि अंधुक ज्योत्स्नेमधुनी
दिसली निर्मल ती जलधारा

तोंच रुपेरी मधुर चांदणें
लपलें काळ्या ढगांआड तें
कुजबुजलें अन् मनांत कोणी
जीवन चंचल असेंच असतें !

# नर्तिकेस

तूं नृत्यभूमिवर येशी दिव्य शुभांगे
जणुं सुगंध कोमल तरळत पवनासंगें
पाहुनी फुलांचा रम्य कुशल तव साज
नव–वसंत–सुषमा गमे प्रकटली आज

क्षण निश्चल झालिस तूं जणुं ज्योति निवांत
तव देह थरारे चपलेसम क्षणिं कांत
क्षणिं विभ्रम ! सुंदर नाव तरङ्गीं डोले
नागीण वक्र वा सूर्यप्रकाशीं खेळे

ये पैंजणरव मधु पडतां पद तालांत
जणुं नादतरङ्गीं विभ्रम होती सार्थ
नव आकृति मोहक निर्मुनि कमल–करांनीं
तूं आंतरभावां चित्रित करिसी राणी !

जनमनीं भावनासागर हा अनिवार
स्वच्छंद खळबळे नसेच त्याला पार
एकेक उचलुनी तरङ्ग त्याचा जणुं कीं
तूं गुंफिसि रमणी अपूर्व नृत्यविलासीं

तूं नृत्यभूमिवर येशी दिव्य शुभांगे
जणुं विश्वमधुरिमा प्रकटे तुझियासंगें !

## रजनी

विचित्रवर्णी संध्याछाया
हळुहळु आतां काजळती या
कुणी अभागी येइ नाखवा
घरास, कापित अथांग दर्या

उंच उंच अन् माडांच्या या
विस्कटलेल्या माथ्यावरुनी
एकाकी ही घार परतते
वेगानें निज घरट्यालागुनि

नांगरलेल्या होड्यांमधुनी
दिवे सान हे उदास जळती
प्रतिबिम्बें तीं जळांत त्यांचीं
दुःखित हृदयासम थरथरती

आकाशाच्या पार्श्वभूमिवर
दुर्गाची ही कृष्ण आकृती
प्रचंड आणिक निश्चल उठते
कुणा अघोरी योग्यासम कीं !

पानोपानीं सळसळतो हा
दर्यावरचा खारट वारा
अंधाराचीं लेणीं चढवित
भयाण चढत्या या अंधारा

हृदयावरच्या अनंत जखमा
मनांतल्या अन् अनेक भीति
रजनीच्या जणुं करस्पर्शनें
पुन्हां वाहती ! पुन्हां जागती !

## अपुरी घडविन

मऊ मेणाच्या मोहक मूर्ती
कुशल करांगुलि घडविति माझ्या
सदाच–परंतु
मनांत माझ्या सलतें कांहीं
तुटतिल फुटतिल दुसऱ्या क्षणिं या
अजस्र कातळ समोर काळा
दण्डहि माझे हे लोखंडी
जीवन–परंतु
अपुरें आहे ! अपुरी घडविन
प्रचण्ड सुन्दर मूर्ती दगडी !

# मनुजसंस्कृति

समस्त अवनीवरी भयद युद्ध–ज्वालामुखी
फुटूनि उसळे, बुडे धरणि रक्त–लाव्हामधें
पडे मनुजसंस्कृती प्रबल यंत्रवेडी अशी
स्वहस्त–हत ही कशी जखमि होउनीया इथें !

चढे अचल–मस्तकीं, गगनिं उंच तैशी उडे
क्षणीं सहज लंघुनी जलधि दीर्घ जाई पुढें
पराभवपरंपरा नित रची यशाची कथा
विराटविजिगीषु ही अशि पडे इथें निव्हला !

हिनें सकल पाहिल्या नभिं निहारिका तारका
अणूंत विलसे तशी सकल जी जगन्मालिका
अहा करुनिया हिनें सतत यंत्र–आराधना
निगूढ रचना कशी सकल सृष्टिची जाणिली !

प्रचण्ड–बल यंत्र हें निज करील ही दास का ?
करील अथवा निकन्दन हिचेंच हें यंत्र का ?

# तुझी उपेक्षा

तुझी उपेक्षा मरण न आणिल माझ्या प्रीतीला !

प्रीत न माझी दुबळी असली
खुळी न जी तव रूपा भुलली
प्रीत न माझी विकारविलसित केवळ क्षणलीला !

अथांग निर्भर अखंड भक्ती
प्रेम खरें तें नच आसक्ती
वदे संस्कृती माझी चपले मत्प्रीती त्रिमला !

तुझी उपेक्षा रोष न आणी
तुझी उपेक्षा द्वेष न आणी
मन हें चिन्ती तुझें शोभने शुभही हरघडिला

उपहासाचें जहर प्राशुनी
अमर प्रीतिचीं गाइन गाणीं
स्वयेंच जळुनी अनलीं फुलणें ठाउक प्रेमाला
तुझी उपेक्षा मरण न आणिल माझ्या प्रीतीला !

# मध्याह्नींचें प्रखर ऊन

मध्याह्नींचें प्रखर ऊन तें
थंड भासतें निळया नभावर
अन् मेघांचे ससे चिमुकले
भुरुभुरु धांवति पवनपथावर

शिसवी दर्या उन्हांत चमके
उसळत फेसाळत मदिरेसम
धुंद डोलती तालतरू तटिं
कुणा शराबी कलंदरासम

शिडें चमकतीं ओळीनें तीं
अथांग पृष्ठावर दर्याच्या
निद्रित प्रमदेच्या जरतारी
पदरावर जणुं सर मोत्यांचा

दूर दूर त्या क्षितिजापाशीं
प्रकाशरेखा होति विकंपित
तप्त वायुवर धांवत येती
प्रखर चपल निज शोभा पसरित

मध्याह्नींच्या सौंदर्याची
ओढ जिवाला लागे दारुण
चपल मोहवी मादक जैसें
क्रांतिपथींचें साहसि जीवन!

# पथशिला

मी चोरासम कां असा फिरतसे ? आहेच मी चोर ना
रात्रीच्या समयीं उभा चुकवुनी येथें म्हणोनी जना
किंवा घोर खुनी म्हणूनिहि कधीं ही मान फांसावरी
सांगावी लटकेल ना म्हणुनिया ताई कशी मी तरी ?

बुद्धी शिक्षण श्रेष्ठ सर्व मजला भाग्यें अहा लाधलें
होई दृष्टि विशाल स्वत्व विरुनी गेलें तमीं हें कळे
तेव्हां मूर्ति मनोमया जननिची या चित्तसिंहासनीं
झाले स्थापुनि पूजनांत रमलों तीच्याच मी मन्मनीं

ध्येयाची परिपूर्णता नच कधीं या मानवी जीवनीं
क्रांतीचा पथ रक्तलांच्छित सदा कालाचिया लेखनीं
स्वातंत्र्यास्तव बंधु जे झगडुनी येतील मागूनिया
होणें मार्गिं तयां परी पथशिला कर्तव्य जीवास या !

सोनेरी पथ शांत उज्ज्वल असे सोडूनि मी या क्षणीं
स्वातंत्र्यास्तव एकला फिरतसे अंधार–मार्गांतुनी !

# चिरविदाय

पुरे सुभगयौवने पथ अतां दुजे आपुले
प्रमत्त मधुस्वप्न हें अजि विरे उषःकालिं या
सुरम्य तव मूर्ति दे तिळ मना न संवेदना
स्वतंत्र पुरुषार्थ हा सखि न संभवे बंधनीं !

विषादमय लोचनीं बघुं नको नको शोभने
क्षणार्ध धरितील ना मज अतां तुझे पाश हे
'अखण्ड मधुप्रीति' अन् सकल त्या खुळ्या भावना
मनुष्यमति–मूढता ! बस विदाय आतां तुला !

मनोज्ञ निज सौरभा पसरि मुग्ध नाचे जलीं
भुलावणि करी जरी मधुहि अल्प तो अन्तरीं
अपूर्व मृदु गीत तें कविप्रमोददायी विरे
अखेर जधिं वेष्टुनी कमल हा ! द्विरेफा धरी

कलागुणसमुच्चया लय स्वदर्थ ना मानिनी
स्वतंत्र पुरुषार्थ तो सखि न संभवे बंधनीं !

# घटहारिता

रंगमंचक अंबरीं अपरा रची नवरंगि हा
जणुं कंचनी मधु यामिनी हळुवारशी प्रकटे अहा
कृष्णशा घनमालिकेंतुनि त्या लकाकति चांदण्या
नेत्रविभ्रम नर्तनीं कपटी करी रजनी कुणा ?

विश्व हें मधुस्वप्नसें उजळी शशी समयीं अशा
दिव्य हा घट वारुणीपरिपूण ये करिं माझिया
फेनिला मधु त्या घटांतिल वारुणी किति प्राशुनी
गुंफिली नवसृष्टि मी निज कल्पनेसह खेळुनी

तारका नवलाख त्या हळु लोपल्या गगनांगणीं
भासते शिशिरांतली सुमवेलशी बघ यामिनी
प्रीतिची स्मृति दुःखदा अशि ही नभीं शशिची कला
रात्रिचा प्रियकूजनासम मर्मरस्वर थांबला

जाहला घट हा रिता बघ बुंद ना तळिं वारुणी
कां बसूं अजि त्याजला हृदयीं पिशासम घेउनी ?

# क्षमस्व

बांधोनी करपाशिं मी जधिं तुझ्या बाले मुखा चुंबिलें
तेव्हां भान नुरे क्षणार्ध मजला हें विश्व हो आगळें
येई जाग पुन्हां क्षणांत मजला, लागे मनाला पिसें
माझा मीच नसे, तुझा वद कसा होऊं तरी राजसे ?

" माया कां मग लाविली तरि वदा वेड्या जिवाला अ
प्रीतीचे रुचतात खेळ नच का तीं बंधनें प्रीतिचीं ? "
बाले, स्पष्ट तुझा सवाल हृदया कांपीत जाई स्वरें
" स्वच्छंदी फुलपांखरासम तुम्ही " हें मात्र नाहीं खरें

ती पूर्वा क्षणचुंबिता नभिं उभी सोडूनि जाई तिला
आकाशीं रवि का तयास फिरणें या पंथिं मागें कदा ?
जेव्हां मृत्युमुखीं विशाल जलधी ग्रासील अंतीं तया
तेव्हां हांसुनिया पुन्हां प्रियतमा पाहील तो एकदां

क्रांतिच्या पथिं जो युवान सुभगे आयुष्य त्याचें नसे
देवी आज क्षमस्व ! मृत्युसमयीं वंदीन मूर्ती तुझी !

# अंधारांतिल वृक्ष उभे

रंगफुलांची परडी घेउनि
लगबग गेली संध्याबाला
तोंच निशेच्या निळ्या अंगणीं
प्रकाशवेली लाख डंवरल्या

डोंगरधारेमागुनि पसरे
तेज शशीचें पूर्व दिशेवर
जणुं तेजाची कमान उसळे
कारंज्यांतुनि वरवर सुंदर

कृष्ण ढगांच्या राशीवरुनी
खुले धवलिमा कडेकडेवर
कापुस-कमळें दाट उमललीं
अथांग डोहाच्या कांठावर

तिमिरावृत अवनीच्या हृदयीं
नर्तन स्पन्दन हळुहळु खेळे
अंधारांतिल वृक्ष उभे मग
तेजाचे नव स्रोतच बनले

# धरी करीं शस्त्र मी !

सदा छळिति दैत्य हे दलित दीन दुःखी जनां
म्हणूनि हृदया तुझ्या अमित जाहल्या वेदना
दधीचिसम अर्पुनी निज समस्त तूं जीवना
तपोधन मुने ! दिलें प्रखर अस्त्र कीं या जनां

न रोष नच द्वेष ना तिळ तुझ्या मनीं हें खरें
विशाल हृदयीं तुझ्या सतत प्रेमधारा स्फुरे
'समस्त मनुवंश हो नित सुखी' तुझें ध्येय तें
म्हणून हृदयीं तुझ्या विमल ती अहिंसा स्फुरे

मदीय प्रिय मातृभू परि जळे सदा बन्धनीं
असह्य मज हें, उठे सतत क्रोधज्वाला मनीं
हवी मज स्वतंत्रता त्वरित ती हवी, कल्पना
विशाल तव रे, धरी शचिपतीच कीं वज्र ना !

ज्वलन्त तव अस्त्र हें नच समर्थ मी घ्यावया
'क्षमस्व भगवन्' म्हणूनिच धरी करीं शस्त्र मी !

# मयकन्यका

सकंप चमके पहा पुलिन शुभ्र विदीर्ण हें
कसें मृगजळांत, अन् मधुर मूक आमंत्रितें !
क्षणोक्षणिं कशा अहा चपल यक्षभूमी इथें
क्षणीं प्रकटती, क्षणीं परि दुज्याच जाती कुठें ?

विचित्र बसली इथें कुणि सुकोमला बालिका
अमानुषि दिसे कधीं जहरि क्रुद्ध नागीण का !
धरूनि करिं आपुलें हृदय ही सदा भक्षिते
हंसे कधीं रडे हिचें अति विचित्र सारें असें

अथांग पुलिनीं कधीं नवलसृष्टि ही निर्मिते
कधीं गगनगामिनी मधुर गीत आलापिते
कधीं विकट हांसुनी वदतसे महाकालि ती
" रुचे मजसि हें अहा हृदयरक्त माझें किती ! "

वसे पुलिनिं स्वैरिणी प्रबल रुद्ररम्या अशी
प्रमत्त मयकन्यका उठवि इन्द्रजाला कशी !

## प्रफुल्ल पुष्पापरि तूं होतिस

प्रफुल्ल पुष्पापरि तूं होतिस
सखि शय्येवर माझ्या निद्रित

धुंद सुगंधित वातावरणीं
कणकण झाले ईषत्कंपित
सागरलहरी धांवत आल्या
चंद्ररश्मिच्या तारा छेडित

बंकिम अर्धोन्मीलित नयनीं
हांसुनि गेली चंचल बिजली
वर्तुळ लहरी तरळत गेल्या
विरल पिरोजी पदराखालीं

अंगांगाच्या मयसृष्टींतुनि
संगीताच्या स्रवल्या धारा
धुंद जाहला क्षणभर आत्मा
सुगंध पिउनी जैसा वारा

प्रफुल्ल पुष्पापरि तूं होतिस
सखि शय्येवर माझ्या निद्रित !

# मृगजळ

मनांत माझ्या फुटलें झुम्बर
चहूंकडे या पडल्या कांचा
निर्घृण रविकर तुडवित त्यांना
उठवी सुन्दर नाच रश्मिचा

हिरवे पिवळे लाल जांभळे
रंग नाचती पकडूं जातां—
सन्ध्येचें जणुं प्रवाल मन्दिर
मृगजळिं न्हाउनि भुलवी चित्ता

अंधारांतिल दीपशिखेपरि
लपुनी श्रद्धा निराशेंत ही
पकडुनि धरिते शापित जीवन
मृगजळ वाटे मृगजळ नाहीं !

## पिता कर क्षमा

क्षमा कर पिता, क्षमा, धरुनियां करीं शस्त्र मी
स्वदेश-हित-कार्य तें गणुनि शोणितें रंगलों
पिता अजि महत् मला अकथ वेदना जाळिते
तुला विसरलों, तुझा विसरलोंच कीं मंत्र मी

तदा मजसि वाटलें अबल ती अहिंसा तुझी
कळे परि अतां मला अबल मंदधी मीच कीं
विशाळ हृदयांतली अमर प्रेमधारा पिता
तुझ्याच रुधिरासवें प्रगटली किती उज्ज्वला !

पिता तव खुनी खरोखर नसे गुन्हेगार तो
अम्ही तव सुपुत्र या भयद सर्व पापा धनी
तुझ्या चरणिं राहुनी विसरलों अहिंसा, दया
मनुष्य वधिले अम्हीं सहजि भूमिखंडास्तव

करीं शिर धरूनि जी प्रिय स्वतंत्रता जिंकिली
टिकेल क्षण का जरी विमल शोणितें रंगली ?

## १५ ऑगस्ट १९४८

करूं कसा मी स्वातंत्र्याचा असल्या जयजयकार ?
अजुनि शृंखलाबद्ध करींची लेखणि अन् तलवार !

स्वतंत्रतेस्तव लढलों ज्या मी
मृत्युसवेंही झुंज घेउनी
ती न लाभली मजला अजुनी
करूं कुणाचा आणि कशास्तव मी मग जयजयकार

धनवन्तांच्या लहरीसंगें
जनतेचें तें जीवन रंगे
मानवता ही धुळींत भंगे
पदिं सत्तेच्या न्यायदेवता लोळतसे लाचार !

सत्यान्वेषी प्रखर लेखणी
सत्यभाषिणी स्वतंत्र वाणी
जनसेवेची तळमळ ज्ञानीं
क्षणार्धांत ये अजुनि तयांच्या नशिबीं कारागार

बन्धुजनांचे मुडदे पडले
भगिनींचेंही शील भंगलें
राजकारणी खेळ चालले
रक्षणार्थ परि माझ्या नच मज शस्त्राचा आधार !

परसत्तेची छाया गेली
स्वतंत्रता नव जन्मा आली
परी कल्पिली मनीं पूजिली—
स्वतंत्रता ती कुठें ? करूं मी कसला जयजयकार ?
हाय शृंखलाबद्ध करींची लेखणि अन् तलवार !

# छायेपरि...

छायेपरि बघ धांवत होती
दिवसयामिनी जीवनिं या
नित्यक्रमानें दिन उगवे तो
निशाहि नकळत जाइ लया

जीवनदर्शन देतां परि तूं
आज भासती दिनरजनी—
अग्निपथापरि; श्रमतों दिनभर
चिन्तनिं नाचे मम रजनी !

आज न केवळ सुमकलिकांवर
रश्मिशलाका नाचति या
जीवन अर्पण करुनी सन्तत
पुष्प मनोहर फुलविति त्या

निर्झर कलरव करितो विपिनीं
गान मनोहर गात फिरे
आज तयाच्या मंजुल गानीं
पूर्ण समर्पण प्रीति स्फुरे

आज जाळितों जीवनज्योती
जळेल भरभर जळुंदे ना
अन्धाराच्या पार्श्वभूमिवर
क्षण तेजःकण फुलतिल ना !

# दोन अश्रू

हे दोन अश्रू
हे दोन अश्रू नयनीं मदीय
आले, न हें दुःख असह्य काय ?
पिता जयानें
दिली मला संस्कृति जीवनाची
दिली जगा संस्कृति जीवनाची
विनष्ट होत
विनष्ट होतां मनु–वंश–श्रेष्ठ
द्रष्टा युगांचा जधिं हो विनष्ट
हे दोन अश्रू
यावे न का हे नयनीं मदीय ?
द्रवे शिलाही जधिं तप्त होय !

हे अश्रु माझे
हे दोन अश्रू नच दुर्बलाचे
किंवा न हे मूढ अशा मनाचे
देशार्थ ज्यानें
स्वयं सुखें घेऊनि क्रान्तिदीक्षा
मृत्यूचिही अन् करुनी उपेक्षा
आयुष्य सारें
अमोल अन् वैभवपूर्ण ऐसें
स्वातंत्र्यवेदीवर होमिलें तें
अशा मनाचे

हे मर्द अश्रू, नच दुर्बलाचे,
असेल आणी जरि हेंच साचें
केव्हां तरी ही
कधीं तरी ही दुनिया समस्त
निःशंक घेईल नवें स्वरूप
निदाघ तप्त
वैराण अन् शुष्क अशी धरित्री
प्रफुल्ल होऊनि हंसे जशी ती
आषाढ बिंदू
आषाढ बिंदू नभ ज्योतिपूर्ण
झेलूनि देहीं निज दग्ध भिन्न

आषाढ—शक्ति
या दोन अश्रूंत समावलेली
निर्माण निःशंक करील साची
त्या प्रेषितानें
उत्क्रान्तिच्या दिव्य उपासकानें
क्षणोक्षणीं जीवनिं शांततेनें
अन् मृत्युकालीं
जी कल्पिली संस्कृति जीवनाची
अपेक्षिली जी रचना जगाची.
हे दोन अश्रू !

मोहवुनी मानस मम
दावियली मधु सृष्टी
मृगजळ परि तें कळतां
दुःख भरे हृदयघटीं
        वेडा हा जीव झुरे
        जगण्याचा मोह नुरे
अणुरेणुंत साद उठे
जग हें स्वार्थी कपटी

*

अश्रूंनों, आज जरा
थांबा तुम्हि येउं नका
दावितसां भाव तुम्ही
जगता ते कळतिल का ?
        दंभ कुणी म्हणतील ना !
        दुर्बलता गणतिल ना !
माणुसकी जगताची
मरुन किती झालिं युगें !

*

अश्रू हे थरथरती
गालांवर तव रमणी
काय वदे ऐक तरी
बुल्बुल् हा त्या बघुनीः
        ‘ गालांवर अश्रु गडे
        प्रियस्मृतिनें ओघळले ?
प्रियस्मृति वा अश्रूंनीं
टाकिसि तूं धुवुनि गडे ? ’

स्वर्गांतुनि जधिं रसिके
भूवर या आलिस तूं
वदनींची दिव्य सुधा
स्वर्गांतच भुललिस तूं
सुन्दर ही सान खळी
शोभतसे तव गालीं
रिक्त सुधापात्र जणूं
उरलें हें गालिं गमे !

*

सागरपदिं अर्पिसि तूं
सरिते निज जीवन हें
तिळभर नच तज्जीवन
त्याग तुझा बदलुं शके
गगनाला गवसणि तो
घालाया नित झटतो
विजिगीषू जीवन सखि
पाहि स्वयंनिष्ठ सदा

*

पाजुनियां दूध तुला
सर्पिणि मीं वाढविलें
वाजवुनी मुरलि तुला
नागिणि मीं डोलविलें
दंश करी आज तरी
मृत्यु कुठें दावि तरी
नातरि तव लालनिं या
उणिव जरा मानिन मी !

हालाहल प्राशुनियां
जगता तूं वांचविलें
हाय चिताभस्म परी
जगतानें तुज दिधलें
        गंगा परि फिरुन शिरीं
        झेलिसि तूं त्रिपुरारी
सुखवाया मानवता
हृदय शिवा तव जळलें !

*

मनुज असे सानच मी
जिंकिल मज नश्वरता
नश्वरता तुडवित परि
जात पुढें मानवता
        क्षणजीवी लहर विरे
        अमर परी अब्धि ठरे
लहरींची सान गती
कालातित करि दर्या !

*

झाली बघ मृत सन्ध्या
गगनिं चिता जळते ही
तीमधुनी स्फुलिंगच
तारांचे नभिं उडती
        वरखालीं तम भरला
        मार्ग पुरा झांकळला
स्थैर्य पदां येइल ना
पुरुषार्थचि मम साथी !

ठेवुनि बहुकाल मनीं
पूजियली तव प्रतिमा
ठरलों मी निंद्य परी
जगतीं या मज न तमा
देव कुणी तुज वदती
दगड कुणी तुज म्हणती
ठाउक मज तूंच परी
हृदयींचा पुष्पागम !

*

मृगजळ हें थांब मृगा
वेड्यासम धावुं नको
जल नच हें मृत्यु उभा
आशेनें मोहुं नको
वेड्या या वाळुरणीं
जाशिल ना उरिं फुटुनी !
मरणारच धावुनि तूं
तुजशीं हा वाद नको !

*

एकाकी पथिक कसा
शोधित पथ निज जाई
चहुंकडुनी वेढित त्या
तिमिर किती घन येई
सौदामिनि तेज तुझें
चमकुनियां क्षणिं गेलें
मार्ग परी आंखुनियां
तितुक्यांतच तो घेई !

दरियाच्या लहरींपरि
कविता नित फुलती या
क्षण डुलती, क्षण हंसती
क्षणिं दुसऱ्या विरती या
        निरवधि परि या काला
        पृथ्वीला या विपुला
जिंकुनि जगणार अशी
अमर कशी लिहुं कविता ?

*

चुम्बुनियां मींच तुला
फुलवियलें रम्य फुला
भ्रमराली जमवुनि ही
उधळिसि अजि निज मधुला
        संपुनि हा जाइल मधु
        आणि दलें होतिल अधु
सायन्तनिं म्लान मुखा
फिरुनि तुझ्या चुम्बिन मी !

*

मन्दिर हें ही नीती
नाटक हें ठाउक मज
भीतीविण पाप जगीं
अन्य नसे ठाउक मज
        नव नीती नव मन्दिर
        घडवितसे अति सुन्दर
मानवता ही देवी
मन्दिर तिज प्रीतीचें

विश्व किती तरि विशाल
जीवन मम अणुइतुकें
सुहृदा रे थांब जरा
बल अणुचें पाहुनि घे
होइल क्षण मुक्त जरी
यांतिल ही शक्ति तरी
बदलिल ती विश्व क्षणीं
शंका तिळ यांत नसे !

*

अन्तरिं जरि अम्बुधि हा
जळतो नित सुहृदा रे
जीवनिं परि बघ त्याच्या
संगीतच दिव्य झरे
दिसलि कुणा कधिं साची
तळमळ त्या हृदयाची ?
जळत्या निज जीवनिं रे
सुख देती श्रेष्ठ जगा

*

विस्मृति नच स्पर्शि जिला
कल्पिलि मीं प्रीत अशी
मरणाशीं झुंज करी
त्यागमयी दिव्य अशी
आज परी हन्त कळे
केवळ हें काव्य खुळें
क्षण मीलन क्षण जीवन
विरणें लाटेसरशीं !

हात दिला एक करीं
चित्तिं वसे कोणि दुजा
शय्येवर एक पडे
स्वप्निं कुणी चुम्बि दुजा
मङ्गलमय अशि माता
निर्मितसे का जगता ?
फ्रॉइड तूं बुद्धिबळें
शोधियलें सत्य तरी ! !

*

स्वैरिणि तूं गगनींची
हृदयीं तव तिळ न दया
सौदामिनि चंचल तूं
चिरिशी या घनहृदया
श्रेष्ठ गडे जीवन तें
मरणांतहि परि जगतें
घन अश्रू देति पहा
जगतां नवजीवन तें !

*

कुसुमतृणावृत सुन्दर
तनु शोभे तव खुलुनी
नित्य तुझ्या हृदयिं जळे
लाव्हारस परि धरणी
सुन्दरता जरि देहीं
आग मनीं तव पाही
सन्तति तव मानव हा
प्रकटे तव घेउनि गुण !

रुधिरारुण चक्र करीं
घेऊनि ये गगनिं उषा
तारांकित रजनिसवें
दूर पळे तिमिर कसा
        ऊठ सखे पाहि तरी
        वृक्षशिरीं शैलशिरीं
उठवित निज पदचिह्नें
अवनिवरी येत उषा

*

आणि जहांगीर तुझी
प्रीत खरी मर्दांची
विसरलि नच जी कधिंही
जीवसखी हृदयाची
        वैऱ्यांतें वधुनि पुन्हां
        मिळवियली नूरजहाँ
ताज नको स्फटिकाचा
सांगाया प्रीत तुझी !

*

फेंकित निज रश्मिजाल
चन्द्रकला स्वैर फिरे
वेड्यापरि नाचुनि हा
अब्धि कसा येथ झुरे
        गगनींची मधुराणी
        जाणारच ती निघुनी
जाळित उरिं वडवाग्नी
सिन्धु परी कां जगतो ?

मंजुळ जें गीत वनीं
नित्य पडे मम श्रवणीं
गिरिकन्दरिं सुमनें जीं
नटती नव रंगांनीं

त्यांतुनि जें काव्य स्फुरे
त्यानें मम हृदय भरे

वाचन त्या काव्याचें
नित्य घडो मज साचें !

*

बंकिम ही गगनिं पहा
बीजेची कोर चढे
चढत्या या चंद्रासम
जाणें सखि मजसि पुढें

प्रीतीचा मधु प्याला
ओठीं जरि लावियला

आस वृथा–राहिन मी
कवटाळुनि त्यास गडे !

*

छलकसि तूं उसळसि तूं
दावित निज मधुकिमया
फेनिल तव रूप गडे
कविता मनिं फुलवी या

थांब सखे थांब जरा
इतुका नच गर्व बरा

मूल्य तुझें नच कवडी
मद्यपि जरि मी न इथें

सुहृदा रे केवि असे
प्रीतीची वारुणि ही
बिन्दूस्तव एक तिच्या
नित रडते दुनिया ही
प्रीतीचा परि प्याला
लागे जधिं ओष्ठाला
अश्रूंचा बघ दरिया
निर्मुनि ती त्यांत बुडे !

*

आशा मनिं होती ही
प्रिय रसिके येशिल तूं
हृद्वीणा नीरव मम
वाजवुनी हंसशिल तूं
अबुध करीं फुटलि गडे
हृत्तन्त्री हाय रडे
स्थितिभान न तिळ तुजला
गाइल ही केवि अतां !

*

नृपनन्दिनि जाशि पुढें
कुस्करुनी हृदयफुला
उलथवुनी जासि गडे
प्रीतीचा मधु प्याला
सिंहासनिं जाउनि निज
बसशिल तूं--बैस सुखें
तळमळ या हृदयींची
दाविन ना कधिं तुजला !

जलदांच्या धवल अशा
सोपानावरुनि अहा
उठवित निज पदचिह्नें
नभमन्दिरिं येइ उषा
आणि तिच्या शुभ करिंचें
रक्तोत्पल हें रविचें
गगनान्तरिं केवि खुले
ऊठ सखे ऊठ पहा !

*

सुन्दर हीं सान फुलें
सुन्दर या नभिं तारा
फुलवित गिरिवन सारें
झुळझुळती जलधारा
सौन्दर्या बघुनि अहा
लोभावत जीव पहा
जीवन मम लढण्यास्तव
मृत्यु जरा व्याधि परी !

*

गळलीं तीं उडुसुमनें
नभवृक्षावरुन अहा
प्रणयाची धुन्द निशा
स्वप्नासम सरलि पहा
प्रखर रवी बघ वरती
दाहि दिशा या जळती
गोड स्मृती जपत उरीं
क्रमिन पुढें पथ माझा !

राबविसी दिनभरि मज
आज शिळ्या रोटीस्तव
रक्तांतुनि माझ्या बघ
ह्मले हे उठती नव
ताणुं नको तार अती
केव्हां जर तुटली ती
फटकारुनि तुजला रे
मृत्युमुखीं धाडिल ती !

*

गार्गी, तुज पति वदला :
' प्रिय न पती पतिसाठीं
प्रिय सगळें अपुल्यास्तव
प्रीति असे जगिं स्वार्थी ! '
उपनिषदें अन् स्मृति त्या
बघतों अम्हि तव पतिच्या
सुज्ञ अशा त्या ऋषिला
नाचविलें तूं कितिदां !

*

तारांकित गगनश्री
गिरि निर्झर वनमाला
अनिमिष या बघतांना
सुख होई हृदयाला
प्रेमळ जणुं आहा कुणि
वदती मधुवच कानीं
भासतसे सृष्टितुनी
फुलते कीं मानवता !

प्रीति दिली एक करीं
घर रचिलें दुसऱ्यास्तव
संस्कृतिचीं मधु वचनें
नित फुलती वदनीं तव
धन्य तुझी नाट्यकला
वन्दन मम रमणि तुला
अशि तुजला निर्मितसे
परि अमुची नीतिच ना ?

* *

गगनान्तरिं घुमते ही
विश्वाची उडुमाला
बिन्दूहुनि नच मोठें
स्थान तिथें पृथ्वीला
पृथ्वीवर बिन्दुपरी
मानवता दिसत खरी
अपघातच अज्ञपथीं
जीवन का मनुजाला ?

* *

बन्ध किती प्रबल पहा
तोडियले आजवरी
मृदुल अती सूक्ष्म असा
हा न तुटे बन्ध परी
तोडाया जों बघतों
वेढी मज पुनरपि तो
आमरणच का ऐसा
बंधनिं मी राहणार !

तोच शशी नभिं विलसे
तीच खुले मधुरजनी
सागर हा तोच इथें
स्वरहि तेच मधुर वनीं

तीच समीरणलहरी
मंजभंवतीं खेळ करी

तोच इथें मीहि परी
मधुराणी आज कुठें ?

*     *

सम्राटा स्मारक हें
भव्य आणि रम्य असें
तुझिया त्या प्रीतीचें
यमुनेच्या तीरिं वसे

दिव्य कला बघतां ही
शंका परि मनिं येई

काजळली यमुना का
मजुरांच्या रक्तानें !

*     *

मन्दिर हें ही मूर्ती
पूजियली आजवरी
जीवन हें त्या भंवतीं
तडफडतें बन्धनिं परि

मूर्ति अतां फोडितसें
मन्दिर हें भंगितसें

सान्तांतुन जीवन हें
आज अनन्तांत रिघे !

मारियली परमेशा
लाथ उरीं तव भृगुनें
मिरविसि तूं नित्य परी
लांच्छन तें शान्तपणें
          दिव्य तपोबल ऋषिचें
          म्हणुनि घडे नच ऐसें
भक्तांवर आपुल्या रे
अविचल तव प्रेम प्रभो !

*          *

बकुळीची ही माला
सुकलि जरी सुहृदा रे
गन्ध तिचा मृदु सुखवी
हृदया तव केवि बरें
          जाई मी निघुनि जरी
          भेटहि नच पुनरपि तरि
स्मृति माझी हृदयाला
नित्य तुझ्या सुखविल रे !

*          *

निर्वासित शरणार्थी
वदतों अम्हि सहजीं रे
शब्दांचे अर्थ परी
चिरिती तव हृदया रे
          दुर्बल तूं घर अपुलें
          सोडुनियां येशि इथें
निर्वासित तूं परि रे
शरणार्थी अम्हि म्हणुनी !

खोदुनियां पत्थर मी
मूर्ति अहा घडवियली
अर्पुनियां जीवन निज
पूजेस्तव सजवियली

‘ प्राणार्पण हें अभिनव
दुर्बलता केवल तव ’

हंसुनि मला हाय वदे
पत्थर परि पूजित तो !

* *

प्रीतीची मृदुकलिका
रूढीच्या पायदळीं
चुरगाळुनि गेली ही
चिरदुःखच ये भाळीं

फसवित मी नित जगता
ये जीवनिं दांभिकता

भीति मनीं जरि माझ्या
नीति खरी तेथ कुठें ?

* *

सुमनांचें मृदु विकसन
सन्ध्येची रंगकला
तारांचें नित नर्तन
आणि उषा ही विमला

खुलत अशी नित राहिल
सुन्दरता सृष्टींतिल

मानव परि हिंसेनें
आणिल जगिं भीषणता !

घरट्यांतिल पक्ष्या रे
वृक्ष न हा तुजसाठीं
सांभाळुनि पाहि उभा
स्कन्धावर किति घरटीं
निःसंशय सुहृद तुझा
इतरांचा तेवि सखा
सर्वांस्तव जगिं असतें
जीवन तें भव्य गड्या !

*　　*

असशि क्रियाशील सदा
अविरत तव श्रम सिन्धो
स्फूर्ति तुला जीवनिं ही
कुठुनि मिळे वद बन्धो
गुप्त समीरण लहरी
तुजकरवीं खेळ करी
परि तिजला जाणिव का
अपुल्या या शक्तीची ?

# उषा

सखि उषा मनोरम आली ग
लाल कमलसम रवि प्राचीच्या सुवर्णसरसीं फुलला ग

नव रंग तरंगत आले ग
घनपुंज उजळले सगळे ग
नील विमल नभिं जणु रत्नांचा रंगपरागच भरला ग

बघ विहंग गगनीं उडती ग
जणु सुरंग सुमनें उधळी ग
लाल मृदुल पदिं मुग्ध उषेच्या सहर्ष अवनी श्यामल ग

निज रंग पिसारा हंसरा ग
सखि शैल नभावर पसरी ग
नीलकण्ठ जणुं धुंद चपल पदिं क्षितिज तटावर नाचे ग

घन सुनील सागर कंपित ग
जणुं हिरण्यगर्भीं स्पंदित ग
आज अकल्पित उदयोन्मुख नव तेजस्वी मधुसृष्टी ग

सखि स्वप्न सुकोमल हंसरें ग
नव धुंद सुगंधित प्रगटे ग
आज तरल मन परमेशाचें विश्वरूप मृदु निरखी ग

# नाट्यनृत्य तें

नाट्यनृत्य तें फुलवित सुंदर
रंगभूमिवर रसिकें आलिस
अन् हृदयाच्या रंगभूमिवर
प्रीतिनृत्य नव निर्मुनि गेलिस

मूक तुझा तो अभिनय अजुनी
ढळे न डोळ्यांपुढुनि जरासा
त्याच अभिनयासंगें विसरे
मूक मनाचा करिसि खुलासा

तृषार्त माझ्या नयनां भिडले
निळे निळे तव चंचल डोळे
अन् गालांवर तुझिया रमणी
संध्येचे नवरंग उमलले

सुगंधश्वासें भारुनि नंतर
अधर–वारुणी तुवां पाजिली
निज हृदयाशीं मस्तक माझें
धरुनी, वचनें मोहक दिधलीं

प्रीतिसुमांच्या गुंफित माला
तूंच जीवनीं सखये आलिस
अंगाराची करित पेरणी
आज अचानक निघुनी गेलिस

# मोहिनी

नेत्रांचीं कमळें अधोमुख सदा होती मला पाहतां
ओष्ठांचीं फुलती स्मितांकित हळू डाळिंबपुष्पें अहा
सिंधूच्या लहरी विलोल खुलती बालार्क तेजान्वित
लज्जारंग तसे मुखावरि तुझ्या हे नाचती मोहक

चंचूमीलनिं रम्य नाचति जसे ते पारव्यांचे गळे
चाळा या करिती कराङगुलि तुझ्या वस्त्रासवें मोहने
देहाची मृदु हालचाल तव ही पाहूनियां चंचले
पुष्पांनीं बहरोनि डोलत गमे वेलीच मंदानिलें

कारंजांतुनि उंच उंच उडतां जैशा तुषारांतुनी
रंगांच्या तरलच्छटा चमकती, तैशी तुझी मोहिनी
राहे द्राक्षरसांत जेंवि लपुनी मद्यार्क उन्मादक
तैशी प्रीति गमे तुझ्याच लपली क्रीडेंत श्रृंगारिक

बाले क्रान्तिपथीं निरंतर मला कर्तव्य खेंचीतसे
प्रीतीचा तव या करूं तरि कसा स्वीकार मी या क्षणीं ?